**लेखाशिर्ष २५०५ ००२२ (०२) मजूरी अंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी विविध बाबी करिता खर्च करण्यास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
**नियोजन विभाग,रोहयो प्रभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-मग्रारो-२०१९/प्र.क्र.६१/रोहयो-७**
नवीन प्रशासन भवन, १६ वा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक :- ०६ नोव्हेंबर,२०१९.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजना ही सन १९७७ च्या कायद्यान्वये महाराष्ट्रात राबवली जाते तसेच सन २००८ च्या कायद्यान्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना राज्यात राबविली जाते. सदर योजनेंतर्गत १०० दिवसांपर्यत मजूरीचे प्रदान केंद्र शासनातर्फे तर १०० दिवसांवरील मजूरीचे प्रदान राज्य शासनातर्फे केले जाते. सदर योजनेंतर्गत जलसंधारणाची कामे, माती उपचाराची कामे, रस्त्याची कामे, वैयक्तिक स्वरुपाची कामे, रोपवाटीका, सामाजिक वनीकरण, तसेच इतर मत्ता निर्माण होणारी कामे घेतली जातात.

लेखाशिर्ष २५०५ ००२२ (०२) मजूरी यातून विभागाच्या निर्मितीपासून आस्थापना अनुदाने, नियमित भूसंपादनाचे प्रकरणे, वेळोवेळी न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार हजेरी सहाय्यकांचे मानधन, क वर्ग नगरपालिका व नगरपंचायत या क्षेत्रातील कामाकरिता कुशल व अकुशल निधी, इत्यादी बाबींचा खर्च करण्यात येतो.

लेखाशिर्ष २५०५ ००२२ (०२) मजूरी यातून खर्ची टाकण्यात येणा-या विवीध बाबी निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या दिनांक १०/०८/२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय उद्दीष्टशिर्षाचे खर्चाचे सांकेतांक लेखांकित करण्यात आलेले आहे. त्या अनुषंगाने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत लेखाशिर्ष २५०५ ००२२ या खाली केला जाणारा खर्च हा त्यासमोर नमूद उद्दीष्टनिहाय शीर्षाखाली खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | खर्चाच्या बाबी | उद्दिष्टनिहाय खर्चाचे शीर्ष सांकेतांक |
|---|---|---|
| १ | पाझर तलावासाठी केल्या जाणा-या भूसंपादनाचा मोबदला | ५० - इतर खर्च |
| २ | नगरपालिका/नगरपंयाचतींना मजुरीसाठी वितरीत केले जाणारे अनुदान | ३१ - सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर |
| ३ | हजेरी सहाय्यकांचे मानधन/वेतन यावरील खर्च | ०२ - मजुरी |
| ४ | सदर योजनेच्या प्रभावी अंमलबतावणीकरिता नियुक्त करण्यात आलेल्या कंत्राटी कर्मचा-यांचे मानधन | १० - कंत्राटी सेवा |
| ५ | नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने वेळोवेळी समाविष्ट करावयाच्या इतर अनुषंगिक बाबी | ५० - इतर खर्च |

सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०९/२०१९/१४३४ दिनांक ०६/०८/२०१९ तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४८/२०१९/व्यय-८ दिनांक ०४/१०/२०१९ अन्वये नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आला असून तो महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९११०७१११६५५८६१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Sopan Shinde

Digitally signed by Pramod Sopan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=86df3b89584863ae114ab9dcc19318acf0e1e94714d4f3f2196a35403313b298, serialNumber=562c0254268b830ae4a70ddb0c9df502ae456e874b1b21fe99aa62374414009a, cn=Pramod Sopan Shinde
Date: 2019.11.07 11:20:33 +05'30'

**( प्रमोद शिंदे )**
**उपसचिव (रोहयो)**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव,
४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा.समिती प्रमुख,महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मुख्य सचिव यांचे सहसचिव
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव,मंत्रालयीन विभाग
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त, नरेगा नागपूर.
१०.आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे
१२.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१३.मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
१४.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१५.सर्व जिल्हाधिकारी,
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१७.सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
१८. सर्व अधीक्षक अभियंता,पाटबंधारे/सर्व अधीक्षक अभियंता,लघु पाटबंधारे, (स्थानिकस्तर)
१९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता)
२१.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
२२.सर्व उपायुक्त (विकास)

२३.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२६.सर्व उपसचिव/सर्व अवर सचिव व सर्व कार्यासन अधिकारी,रोहयो
२७.सर्व मंत्रालयीन विभाग,
२८. निवडनस्ती रोहयो-७.